व्ही. शांताराम जीवनगौरव व विशेष योगदान
आणि राजकपूर जीवनगौरव व विशेष योगदान
पुरस्कार निवड समितीची पुनर्रचना
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
शासन निर्णय क्र. शांजीपु १८२० (१३) / प्र.क्र. ९६ /सां.का.४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १ ऑक्टोबर, २०२१

वाचा :- १. शासन निर्णय क्र. मचिम १०९३/१५११९/प्र.क्र.१५९/सांका-१, दिनांक २८ ऑक्टोबर, १९९३.
२. शासन निर्णय क्र. राकप-१०९८/प्र.क्र.४९६/सांका-२, दि. २९ नोव्हेंबर,१९९९
३. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. मचिअ २००५/ प्र.क्र.८२/सां.का.३, दिनांक १५ एप्रिल, २००५
४. शासन निर्णय क्र. मचिअ/ २००९/प्र.क्र.११९/सांका-३, दिनांक ३० मार्च, २०१०.
५. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. संकीर्ण ८२१४/ प्र.क्र.२००/सां.का.४, दिनांक १३ फेब्रुवारी, २०१५
६. शासन निर्णय क्र. राजीपु २०११/प्र.क्र.१८२/सां.का.४, दिनांक ३० मार्च. २०१५.
७. शासन निर्णय क्र. शांजीपु १८१५(१३)/प्र.क्र.७६/सां.का.४, दिनांक १३ एप्रिल, २०१५.
८. शासन निर्णय, संकीर्ण -८२२०/प्र.क्र.१५/सां.का.४, दि. १८ जानेवारी,२०२०

प्रस्तावना :

मराठी चित्रपट क्षेत्राच्या उत्कर्षाकरीता ज्यांनी दीर्घकाळ आपले आयुष्य व्यतित केले आहे तसेच चित्रपट सृष्टीत आपल्या अभिनय, संगीत, निर्मिती, दिग्दर्शन इत्यादी अष्टपैलू गुणांनी त्या क्षेत्रात उत्कृष्ट कामगिरी केली आहे, अशा मान्यवरांस व्ही. शांताराम जीवन गौरव पुरस्काराने तसेच या क्षेत्रात विशेष उल्लेखनीय काम करणाऱ्या मान्यवरास व्ही. शांताराम विशेष योगदान पुरस्काराने सन्मानित करण्यात येते.

२. तसेच, हिंदी चित्रपट क्षेत्राच्या उत्कर्षाकरीता ज्यांनी दीर्घकाळ आपले आयुष्य व्यतित केले आहे तसेच चित्रपट सृष्टीत आपल्या अभिनय, संगीत, निर्मिती, दिग्दर्शन इत्यादी अष्टपैलू गुणांनी त्या क्षेत्रात उत्कृष्ट कामगिरी केली आहे, अशा मान्यवरांस राजकपूर जीवन गौरव पुरस्काराने तसेच या क्षेत्रात विशेष उल्लेखनीय काम करणाऱ्या मान्यवरास राजकपूर विशेष योगदान पुरस्काराने सन्मानित करण्यात येते.

३.	सदर पुरस्कार योजनेअंतर्गत मान्यवरांची निवड करण्यासाठी पुरस्कार निवड समिती गठीत करण्यात येते. उपर्निर्दिष्ट क्र. ६ व ७ च्या शासन निर्णयान्वये यापूर्वीची पुरस्कार निवड समिती कार्यरत होती. मा. मुख्यमंत्री महोदय यांच्या निर्देशानुसार या प्रशासकीय विभागांतर्गत सर्व समित्या उपर्निर्दिष्ट क्र. ८ येथील शासन निर्णयान्वये बरखास्त करण्यात आल्या आहेत. त्यानुसार व्ही. शांताराम जीवन गौरव व विशेष योगदान पुरस्कार निवड समिती तसेच राजकपूर जीवन गौरव व विशेष योगदान पुरस्कार निवड समिती देखील बरखास्त करण्यात आली आहे. त्यामुळे निवड समिती पुनर्गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे व्ही. शांताराम जीवन गौरव व विशेष योगदान पुरस्कार निवड समिती तसेच राजकपूर जीवन गौरव व विशेष योगदान पुरस्कार निवड समिती पुनर्गठीत करण्यात येत आहे.

१) व्ही. शांताराम जीवन गौरव व विशेष योगदान पुरस्कार निवड समिती

अ) शासकीय सदस्य

| | |
|---|---|
| १. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य | अध्यक्ष |
| २. मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य | उपाध्यक्ष |
| ३. सचिव, सांस्कृतिक कार्य | सदस्य |
| ४. व्यवस्थापकीय संचालक, गोरेगांव चित्रनगरी | सदस्य |
| ५. प्रकल्प संचालक, पु. ल. देशपांडे कला अकादमी | सदस्य |
| ६. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय | सदस्य सचिव |

आ) अशासकीय सदस्य

| | |
|---|---|
| १. श्री. सतीश रणदिवे, निर्माता, दिग्दर्शक, लेखन | अशासकीय सदस्य |
| २. श्री. सचिन पिळगांवकर, निर्माता, दिग्दर्शक, अभिनेता | अशासकीय सदस्य |
| ३. श्रीमती रोहिणी हट्टंगडी, अभिनेत्री | अशासकीय सदस्य |
| ४. श्रीमती रेणूका शहाणे, अभिनय, दिग्दर्शन | अशासकीय सदस्य |
| ५. श्री. किरण शांताराम, निर्माता, दिग्दर्शक | अशासकीय सदस्य |

२) राजकपूर जीवन गौरव व विशेष योगदान पुरस्कार निवड समिती

अ) शासकीय सदस्य

| | |
|---|---|
| १. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य | अध्यक्ष |
| २. मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य | उपाध्यक्ष |
| ३. सचिव, सांस्कृतिक कार्य | सदस्य |
| ४. व्यवस्थापकीय संचालक, गोरेगांव चित्रनगरी | सदस्य |
| ५. प्रकल्प संचालक, पु. ल. देशपांडे कला अकादमी | सदस्य |
| ६. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय | सदस्य सचिव |

**आ) अशासकीय सदस्य**

| | |
|---|---|
| १. श्री. महेश मांजरेकर, निर्माता, दिग्दर्शक अभिनेता | अशासकीय सदस्य |
| २. श्रीमती उर्मिला मातोंडकर, अभिनेत्री | अशासकीय सदस्य |
| ३. श्री. नागराज मंजुळे, निर्माता, दिग्दर्शक अभिनेता | अशासकीय सदस्य |
| ४. श्री. विक्रम गोखले, अभिनेता | अशासकीय सदस्य |
| ५. श्री. शिवाजी साटम, अभिनेता | अशासकीय सदस्य |

२. सदर समित्यांचा कालावधी, या शासन निर्णयाच्या दिनांकापासून पुढील तीन वर्षे किंवा समितीची पुनर्रचना होणे यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत असेल.

३. प्रवास व बैठक भत्ता :-

समितीच्या अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित शासन निर्णयानुसार प्रवास भत्ता व बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

४. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी व लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५, १०२- कला व संस्कृती यांचे प्रचालन, (०३) मराठी चित्रपट महोत्सव, (०३)(०१) मराठी चित्रपट महोत्सव, (२२०५ १५४३) ५०- इतर खर्च या लेखाशिर्षातून त्या-त्या वर्षी उपलब्ध असलेल्या मंजुर तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२११००११२२४५९८६०२३ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(स्वाक्षरित)

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

३. मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
७. सर्व शासकीय / अशासकीय सदस्य (संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालयामार्फत)
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा) -१ महाराष्ट्र, मुंबई
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
११. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१३. अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
१४. निवड नस्ती, सां.का.४